शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, मुंबई येथील निवासी/अनिवासी इमारतींच्या बांधकाम/दुरुस्ती कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,
शासन निर्णय, क्रमांक : जीसीएम-२०२४/प्र.क्र.४८३/प्रशा-१,
गोकुलदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन मंत्रालय,
गोकुलदास तेजपाल संकुल, ९ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई -४०० ००१.
दिनांक : ०८ ऑगस्ट, २०२४

**वाचा :** १) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक : संवैशिवसं/शावैममुंबई/विभागांची किरकोळ दुरुस्ती/१०४२१/आय-प/२०२४, दिनांक ०६.०६.२०२४

**शासन निर्णय :**

नवनिर्मित शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, मुंबई येथील शासकीय इमारतीमध्ये विविध विभागांची दुरुस्ती व नुतनीकरण, अधिकारी/कर्मचारी यांच्या निवासस्थानांची दुरुस्ती, डॉर्क्टर्स क्वार्टर्सची दुरुस्ती, अधिकारी/कर्मचारी यांच्या बैठक व्यवस्थेमध्ये बदल करणे इत्यादी कामासाठी रुपये ८,२३,३२,३५७/- (रुपये आठ कोटी, तेवीस लक्ष, बत्तीस हजार, तीनशे सत्तावन्न फक्त) इतक्या रक्कमेच्या बांधकाम अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नाव | अंदाजित किंमत |
|---|---|---|
| १ | Restoration to Administrative Building Prince of Wales Building, Surgical Building, OPD Building, Orthopaedic Building, Old Dr.Quarters, High Rise & Low Rise Building, Nursing Building by renovation & alteration to provide Government Medical College Department Facility at G.T.Hospital Premise Mumbai. | ८,२३,३२,३५७ |
| | एकूण अंदाजित रक्कम | ८,२३,३२,३५७ |

**अटी :-**

१) सदर काम करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबत पुर्तता करण्यात यावी.

२) प्रस्तुत काम पुरातत्व विभागाच्या अखत्यारित येत असल्यास संबंधित विभागाची तसेच महानगरपालिका व तत्सम प्राधिकरणे यांची पूर्व परवानगी घेण्यात यावी.

तांत्रिक मंजूरी देताना राज्य दरसूचीबाह्य बाबींच्या दराकरीता शासन परिपत्रक क्रमांक - २०१७/प्र.क्र११/नियोजन-३, दिनांक ११.०४.२०१७ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

४) प्रस्तावातील खरेदीशी संबंधित बाबींकरीता ई-निविदा प्रणालीचा अवलंब करुन उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाकडील दिनांक २४.०८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सूचना विचारात घ्याव्यात.

५) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय, इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क्र.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

६) स्थापत्य कामाच्या कालावधीतच विद्युतीकरणाबाबत तसेच इतर अनुषंगिक कामांचे योग्य नियोजन करुन सदर कामे पूर्ण करावीत.

७) इमारतीमध्ये दिव्यांगाकरीता उपलब्ध करुन द्यावयाच्या विविध सोयीबाबत शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यात यावी.

८) विषयांकित कामाकरीता सुधारीत प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही, याद्दष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

२. प्रस्तुत बांधकामासाठी येणारा खर्च खालील लेखाशीर्षात मंजूर होणा-या निधीतून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक - एच-०८
४२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च
०३, वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन
१०५-विषमचिकित्सा पंचवार्षिक योजनांतर्गत
(४२१० ००४१) ५३- मोठी बांधकामे

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक २०.०९.२०१९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-१, उप विभाग-५, अनुक्रमांक-१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ (१) नुसार प्रशासकीय विभागाला प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८०८१४३१४४६०१३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUDHIR JAYA SHETTY

Digitally signed by SUDHIR JAYA SHETTY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b8240 6eea05963bc456f1e1e8621e5917d8305, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E9D37D499A521B728AEB3DC8 EC38B759420308B9FD7816002B4AF0FFBF111 1D7, cn=SUDHIR JAYA SHETTY
Date: 2024.08.08 16:45:19 +05'30'

**(सुधीर जया शेट्टी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. आयुक्त (वै.शि.), वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई
२. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
४. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मुंबई विभाग, मुंबई

५. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, मुंबई
६. कार्यकारी अभियंता, एकात्मिक घटक (सा.बां.) विभाग, मुंबई
७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
८. निवासी लेखाधिकारी, मुंबई
९. निवडनस्ती (प्रशा-१).